महाराष्ट्र विकास सेवा गट-ब मधील अधिकाऱ्यांना महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मध्ये तात्पुरती पदोन्नती.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
### शासन आदेश क्रमांक : मविसे-१०१५/प्र.क्र.१८/२०१५/आस्था-३

मंत्रालय, बांधकाम भवन,
२५, मर्झबान पथ, फोर्ट,
तारीख : २१ एप्रिल, २०१५

संदर्भ :-

१) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : एसआरव्ही-२०१०/प्र.क्र.०१/२०१०/१२, दिनांक ०८.०६.२०१०
२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : एसआरव्ही-२०१०/प्र.क्र.०१/२०१०/१२, दिनांक २१.०६.२०१०
३) शासन निर्णय, नियोजन विभाग (रोहयो) क्रमांक : आस्थाप-२०१३/प्र.क्र.२११/मग्रारो-३, दिनांक ३०.०७.२०१४.

**शासन आदेश :-**

श्री.ए.एम.धारस्कर, सहायक गट विकास अधिकारी (रोहयो), जिल्हा परिषद, अहमदनगर यांना सहायक गट विकास अधिकारी गट-ब संवर्गातून उप मुख्य कार्यकारी अधिकारी / गट विकास अधिकारी गट-अ या संवर्गात पीबी-३ वेतनश्रेणी रुपये १५६००-३९१०० ग्रेडवेतन ५४०० या वेतनश्रेणीत या आदेशान्वये तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नतीने नियुक्ती देण्यात येत आहे.

२. तद्नुषंगाने शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०१०/प्र.क्र.०१/१०/१२ दिनांक ८.६.२०१० आणि शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-

२०१०/प्र.क्र.१/१०/ १२, दिनांक २१.६.२०१० नुसार पदोन्नतीने नियुक्तीसाठी विहीत केलेल्या विभागीय संवर्ग संरचना व विभागीय संवर्ग वाटप नियमावली, २०१० मधील तरतूदींच्या अधीन राहून; श्री.ए.एम.धारस्कर, सहायक गट विकास अधिकारी (रोहयो), जिल्हा परिषद, अहमदनगर यांना तात्पुरत्या पदोन्नतीने उप जिल्हा कार्यक्रम समन्वयक (मग्रारोहयो), जिल्हा परिषद, अहमदनगर या पदावर पदस्थापना देण्यात येत आहे.

३. श्री.ए.एम.धारस्कर यांना देण्यात आलेली तात्पुरती पदोन्नती ही खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-

अ) पदोन्नतीच्या कोटयातील पदावर देण्यात येत असलेली सदर पदोन्नती तात्पुरत्या स्वरूपाची असून, ती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

ब) सदर पदोन्नती शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : एसआरव्ही-१०८७/ २००/प्र.क्र.३/८७/ १२, दिनांक ८.१०.१९९० मधील तरतुदीच्या अधीन राहील.

क) सदर तात्पुरती पदोन्नती ही जे अधिकारी ज्येष्ठ आहेत, परंतु ज्यांची प्रकरणे विचारार्थ खुली ठेवण्यात आलेली आहेत, अशा अधिका-यांच्या ज्येष्ठतेस बाधा न आणता देण्यात येत आहे.

ड) सदर तात्पुरती पदोन्नती ही आरक्षणासंदर्भात मा.उच्च न्यायालयात प्रलंबित असणाऱ्या याचिका क्र.८४५२/२००४ मधील T.A. १/२०१४ आणि T.A. २/२०१४ च्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहील.

इ) सदर तात्पुरती पदोन्नती ही त्यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षानंतर पुनर्विलोकन करावयाच्या शासन निर्णयाच्या अधीन राहील.

४. श्री.धारस्कर यांनी तात्पुरत्या पदोन्नतीने नियुक्ती देण्यात आलेल्या ठिकाणी आदेश प्राप्त झाल्यापासून सात दिवसाच्या आत हजर होणे आवश्यक आहे. त्याप्रमाणे ते विहीत मुदतीत नियुक्तीच्या ठिकाणी हजर झाले नाहीत, तर त्यांना नियुक्ती नको असे समजून, शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: एसआरव्ही १०८७/११३१/प्र.क्र.११/८९/१२, दिनांक ३०.४.१९९१ मधील तरतुदीनुसार त्यांची तात्पुरती पदोन्नती रद्द करण्यात येतील.

५. संबंधित विभागीय आयुक्त /मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांनी तात्पुरत्या पदोन्नतीने नियुक्ती देण्यात आलेल्या श्री.धारस्कर यांना स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन, तात्काळ कार्यमुक्त करावे आणि नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर होण्याबाबत संबंधितांना सूचना दयाव्यात. तसेच श्री.धारस्कर यांनी पदभार स्वीकारल्यानंतर त्याचा अहवाल शासनास सादर करावा.

६. श्री.धारस्कर यांनी त्यांच्या तात्पुरत्या पदोन्नतीने नियुक्ती दिलेल्या नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे त्यांनी अनधिकृतरित्या रजेवर जाऊ नये. यासंदर्भात त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्रमांक सीडीआर-१०८२/२५६७/२८/११, दिनांक ३०.८.१९८२ अन्वये दिलेल्या सूचनांकडे वेधण्यात येत आहे. तसेच नियुक्ती रद्द करणेसाठी कुठल्याही स्वरुपाचे आवेदन करु नये. तसे केल्यास सदर कर्मचारी शिस्तभंगाच्या कारवाई पात्र ठरतील याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

७. वरीलप्रमाणे श्री.धारस्कर यांना दिलेल्या पदस्थापनेच्या परिणामस्वरुप; श्री.ए.बी.जोशी (सध्या रजेवर) तत्कालीन गट विकास अधिकारी, पंचायत समिती येवला, जि.नाशिक यांचे उप जिल्हा कार्यक्रम समन्वयक (मग्रारोहयो), जिल्हा परिषद, अहमदनगर या पदावरील बदलीने नियुक्तीचे दिनांक २५.०८.२०१४ चे आदेश रद्द करण्यात येत आहेत. तद्अनुषंगाने, श्री.ए.बी.जोशी यांनी रजेवरुन परत आल्यावर पदस्थापनेसाठी शासनाकडे संपर्क साधावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४०४१४३८५७८६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sarita Rishi Bandekar-Deshmukh

Digitally signed by Sarita Rishi Bandekar-Deshmukh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sarita Rishi Bandekar-Deshmukh
Date: 2015.04.21 16:37:11 +05'30'

**( सरिता रि. बांदेकर-देशमुख)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने )
२. सचिव (रोहयो), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. सर्व विभागीय आयुक्त.
४. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
५. सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी जिल्हा परिषद.
६. महालेखापाल- १ / २ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
८. मा. मंत्री (ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
९. मा. राज्यमंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
१०.मा.प्रधान सचिव (ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहायक
११.**श्री.ए.एम.धारस्कर** (द्वारा : मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर)
१२.**श्री.ए.बी.जोशी** (सध्या रजेवर), आशिर्वाद, अंतुले नगर, हिंगोली, जि.हिंगोली-४३१ ५१३ (द्वारा : मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक)
१३.सामान्य प्रशासन विभाग, (कार्यासन-१२/कार्यासन-१६ब), मंत्रालय, मुंबई
१४.कार्यासन क्रमांक आस्था-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१५.कार्यासन क्रमांक आस्था-३अ, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१६.निवड नस्ती, का.क्र. आस्था-३, ग्राम विकास व जलसंधारण विभाग